# श्रीगणेश
# यंत्र मंत्र साधना

अरविंद सहस्त्रबुद्धे








# गणेशोपासना

गणेश उपासना ही पुरातन आहे. "सुखकर्ता दुःखहर्ता" अशीच आपण त्याची थोरवी गात नाही का? कोणतेही शुभ कार्य असो, अगोदर पूजा केली जाते ती गणपतीचीच. एवढा मोठा अग्रक्रम इतर कोणाला प्राप्त झाला आहे ?

गणपति हा शिवाचा मुलगा मानण्यात येतो. पार्वती एकदा स्नान करीत होती. स्नान करताना तिने आपल्या अंगच्या मळाचा एक पुतळा केला व बाहेर बसविला. थोडयाच वेळात शिव आले आणि या गणपतीने खुद्द शिवालाच अडविले. शिव चिडले व त्यांनी गणपतीचे शिर धडावेगळे केले. पार्वतीला अत्यंत वाईट वाटले व तिने गणेशास जिवंत करण्यासाठी शिवाजवळ हट्ट धरला. शिवानेही हत्तीचे मस्तक तेथे बसवून त्यास जिवंत केले अशी एक कथा आहे. परंतु गणेश पुराणात मात्र कथा सांगितली आहे ती अशी :– दंडकारण्यात त्रिसंध्यक्षेत्रात पार्वती प्रसूत झाली व तिला "गुणेश" नावाचा पुत्र झाला. हाच गुणेश पुढे गणेश बनला. पहिल्या प्रथम शिवाने आपल्या मुलास वैनायक गणांचे आधिपत्य देऊन जगात विघ्न घालण्यास मोकळे सोडले. त्यामुळे गणेश पृथ्वीवर अवतरला तो विघ्नहर्ता म्हणून नव्हे तर विघ्नकर्ता म्हणूनच! परंतु सर्वांनी त्यास सांगितले, "कार्यारंभी आम्ही तुझे प्रथम पूजन करू. तू आमचा रक्षणकर्ता हो." सर्वांच्या प्रार्थनेला गणपति पावला व तो विघ्नहर्ता बनला.

गणेश ही देवता सर्व विघ्नांचा नाश करणारी असल्यामुळे कोणत्याही कार्याचे आरंभी गणेशाचे पूजन किंवा स्मरण होणे

आवश्यक आहे. अष्टादश पुराणांचे निर्माते वेदव्यास यांनी सुद्धा प्रारंभी गणेशस्मरण न केल्यामुळे त्यांना स्फूर्तीच होईना तेव्हा ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून त्यांनी गणेशपूजन केले आणि निर्विघ्न-पणें सर्व पुराणांची रचना केली असे गणेश पुराणात लिहिले आहे.

सामान्यतः गणेश ही देवता चतुर्भुज, एकदंत, गजमुख अशीच वर्णिलेली आहे. तथापि मंत्रशास्त्रामध्ये तिचे ध्यान अनेक प्रकारे वर्णिले आहे.

गणपति देवतेची गणेश पुराण क्रीडा खंड अध्याय १३२ मध्ये दिलेली माहिती अशी--

चत्वार्यस्य च रूपाणि चतुर्षु च युगेषु च ।
कृते दशभुजो नाम्ना विनायक इति श्रुतः ॥ १ ॥
त्रेतायुगे शुक्लवर्णः षड्भुजोऽसौ मयूरराट् ।
सिंधु हत्वाऽपालयत्सोऽवतीर्य स्वालये प्रिये ॥ २ ॥
स एवायं रक्तवर्णश्चतुर्बाहुर्विराजितः ।
अवतीर्णो गृहे नौ हि सिंदूरं निहनिष्यति ॥ ३ ॥
आरुह्य मूषकं देवो भूभारं च हरिष्यति ।
नाम्ना गजानन इति त्रैलोक्ये ख्यातिमेष्यति ॥ ४ ॥
अयं कलियुगे देवो धूम्रकेतुरिति प्रथाम् ।
चतुर्बाहुश्चारुनेत्रो यायस्ते रुचिरां भुवि ॥ ५ ॥

तथापि गणपतीचे ॐ कार हेच मुख्य रूप आहे. गणेश पुराणा-मध्ये १२ व्या अध्यायात गणपतीचें ॐकार स्वरूप वर्णिले आहे. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि मराठी संत कवींनीही असेच प्रतिपादन केले आहे. पुढील भाग हत्तीच्या सोंडेसारखा दिसतो. म्हणूनच वेदवाक्यात 'स वै गजाकारः' तो (ॐ कार) हत्तीच्या आकृतीचा म्हटला आहे. यावरूनच गणपतीला गजमुख व गजानन ही नावे मिळाली आहेत.

शिवपार्वतींनी मातीची गणेश मूर्ति करून तिची उपासना केली. पुढे तीच मूर्ति सजीव झाली व तीच पुढे शंकराचा मुलगा झाला. त्याचा उत्सव वैशाख १५ ला होतो असा उल्लेख मुद्गल पुराण खंड ३ मध्ये आहे.

तथापि भाद्रपद शु. ४ या दिवशी घरोघरी मातीचे गणपति आणून त्यांची पूजा विधिपूर्वक करण्याचा व तो तसा करावा असा उल्लेख गणेश पुराणात आहे व तसाच सर्वत्र संप्रदायही आहे. गणेश अथर्वशीर्षातही इतर विधींचा उल्लेख न करता 'चतुर्थ्यामनश्नन् जपति' असा चतुर्थीचाच नामोल्लेख आहे. चतुर्थी म्हणजे तुरीयावस्था तो गणपति.

'अवस्थात्रयातीत' म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांचे पलीकडे अर्थात् 'तुरीय' या चौथ्या अवस्थेत असणारा म्हणजे याच अवस्थेत त्याचे स्वरूप-दर्शन होऊन साक्षात्कार होत असतो याकरिता चतुर्थीचे विशेष महत्त्व मानले आहे.

गणपतीचे वाहन उंदीर आहे. परंतु तेही एक रूपकच आहे. उंदीर हा कालस्वरूपी मानला आहे, उंदीर ज्याप्रमाणे अहर्निश उद्योगात असतो, सर्व वस्तु कुरतडून नाश करतो, तसाच कालही सृष्टीतील सर्व पदार्थांचे आयुष्य कुरतडून व्यर्थ करतो. अशा या सर्वनाश करणाऱ्या काळाला गणपतीने जिंकून व त्याला वाहन बनवून आपल्या इच्छेप्रमाणे वागायला लावले आहे.

गणपत्यथर्वशीर्ष हा गणपति उपासनेचा उत्तम मार्ग आहे. जो नित्य नियमित अथर्वशीर्षाचे पठण करतो तो ब्रह्मस्वरूपाला प्राप्त होतो. त्याला सर्व सुखप्राप्ति होते. त्याला कोणत्याही विघ्नाची बाधा होत नाही. तो साधक सर्व पापांपासून मुक्त होतो. संध्याकाळी पठण केले असता सकाळी केलेल्या पापांचा

नाश होतो व सकाळी पठण केले असता रात्री केलेल्या पापांचा नाश होतो. एवंच काय, तर सकाळी व रात्री पठण करणारा मनुष्य निष्पाप बनतो. त्याची सर्व पापे हरण होतात. सर्वत्र पठन करणारा निर्विघ्न होतो, आणि त्याला धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचा लाभ होतो. अथर्वशीर्षाची १००० आवर्तने केली असता ज्या ज्या इच्छा असतील त्या त्या पूर्ण होतात.

अथर्वशीर्षाने जो गणपतीला अभिषेक करील तो उत्तम वक्ता होतो. चतुर्थीचे दिवशी काही न खाता उपोषित राहून जो सर्व दिवस याचा जप करतो तो विद्यासंपन्न होतो.

अशा या गणेशाचे माहात्म्य फार मोठे आहे. त्याची मनोभावे पूजा करून सर्वांनी याचा या कठीण युगात फायदा घ्यावा. गणपति ही बुद्धीची देवता. लहान मूल अभ्यासाला सुरवात करतें तें 'श्री-ग णे शा य नमः' या पासूनच. विद्यार्थ्यांनी जर रोज गणपतीच्या पुढील मंत्राचा १०८ वेळा जप केला तर त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता निश्चितपणे वाढेल.

ॐ गं गणपतये नमः ।

गणपति देवतेला खालील फुले व वस्तु आवडतात.

तांबडी फुले, मंदार पुष्प, जास्वंदीची फुले, शमी, दूर्वा, तांबडी कमळे, शेंदूर, रक्तचंदन, तांबडे वस्त्र गंध – रक्तचंदन, अक्षता – तांबडे धुतलेले तांदूळ, नैवेद्य – मोदक.





## श्रीगणपतिपूजा

श्रीगणेशाय नमः । ॐ केशवाय नमः । ॐ नारायणाय नमः । ॐ माधवाय नमः । ॐ गोविंदाय नमः । ॐ विष्णवे नमः । ॐ मधुसूदनाय नमः । ॐ त्रिविक्रमाय नमः । ॐ वामनाय नमः । ॐ श्रीधराय नमः । ॐ हृषीकेशाय नमः । ॐ पद्मनाभाय नमः । ॐ दामोदराय नमः । ॐ संकर्षणाय नमः । ॐ वासुदेवाय नमः । ॐ प्रद्युम्नाय नमः । ॐ अनिरुद्धाय नमः । ॐ पुरुषोत्तमाय नमः । ॐ अधोक्षजाय नमः । ॐ नारसिंहाय नमः । ॐ अच्युताय नमः । ॐ जनार्दनाय नमः । ॐ उपेंद्राय नमः । ॐ हरये नमः । ॐ श्रीकृष्णाय नमः ।

वरील २४ नावांपैकी पहिल्या तीन नावांचा उच्चार करून प्रत्येक नावाच्या शेवटी संध्येच्या पळीने उजव्या हातावर पाणी घेऊन आचमन करावे (आचमन करतेवेळी तोंडाने आवाज करू नये.) चौथ्या नावाचा उच्चार करून संध्येच्या पळीने उजव्या हातावर पाणी घेऊन ताम्हनात सोडावे. याप्रमाणे दोनदा करावे. नंतर नावांचा उच्चार करून प्रत्येक वेळी नमस्कार करावा. सर्व नावे संपल्यावर प्राणायाम करावा.

येथून पुढे ध्यान करावे. ते असे की, हातात अक्षता घेऊन दोन्ही हात जोडावे आपली दृष्टि समोरील देवाकडे लावावी.

ॐ श्रीमन्महागणाधिपतये नमः । कुलदेवताभ्यो नमः । ग्रामदेवताभ्यो नमः । स्थानदेवताभ्यो नमः । वास्तुदेवताभ्यो नमः । मातृपितृभ्यां नमः ॥ श्री लक्ष्मीनारायणाभ्यां नमः । आदित्यादिनवग्रहदेवताभ्यो नमः । सर्वेभ्यो देवेभ्यो नमः । सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमः । निर्विघ्नमस्तु ।





समुखश्चैकदंतश्च कपिलो गजकर्णक: ।
लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिप: ॥
धुम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचंद्रो गजाननः ।
द्वादशैतानि नामानि य: पठेच्छृणुयादपि ॥
विद्यारंभे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ।
संग्रामे संकटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥
शुक्लांबरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजम् ।
प्रसन्नवदनं ध्यायेत् सर्व विघ्नोपशांतये ॥
सर्वमंगलमांगल्ये शिवे सर्वार्थसाधिके ।
शरण्ये त्र्यंबके गौरि नारायणि नमोऽस्तु ते ॥
सर्वदा सर्व कार्येषु नास्ति तेषाममंगलम् ।
येषां हृदिस्थो भगवान् मंगलायतनं हरिः ॥
तदेव लग्नं सुदिनं तदेव ताराबलं चंद्रबलं तदेव ।
विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मीपते तेंऽघ्रियुगं स्मरामि ॥
लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः ।
येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः ॥
विनायकं गुरुं भानुं ब्रह्मविष्णुमहेश्वरान् ।
सरस्वतीं प्रणाम्यादौ सर्व कार्यार्थसिद्धये ॥
अभीप्सितार्थसिद्धयर्थं पूजितो यः सुरासुरैः ।
सर्वविघ्नहरस्तस्मै गणाधिपतये नमः ॥
सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः ।
देवा दिशंतु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥

श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्तमन्वंतरे कलियुगे प्रथमचरणे भरतवर्षे भरतखंडे जंबुद्वीपे दंडकारण्ये देशे

गोदावर्याः दक्षिणे तीरे शालिवाहन शके अमुक नाम संवत्सरे (संवत्सराचे नांव म्हणावे) अमुकायने (दक्षिणायन अगर उत्तरायण असेल त्याप्रमाणे उच्चार करावा) अमुकऋतौ (ऋतूचे नांव उच्चारावे) अमुकमासे (महिन्याचे नांव उच्चारावे) अमुक पक्षे (पक्षाचें शुद्ध / वद्य नांव उच्चारावे) अमुक वासरे (वाराचें नांव उच्चारावे) अमुक दिवस नक्षत्रे (दिवसाचे नक्षत्र उच्चारावे) विष्णुयोगे विष्णुकरणे अमुकस्थिते वर्तमाने चंद्रे (चंद्र ज्या राशीत असेल त्या राशीचा उच्चार करावा) अमुकस्थिते श्रीसूर्ये (सूर्य ज्या राशीस असेल त्या राशीचा उच्चार करावा) अमुकस्थिते श्रीगुरौ (गुरु ज्या राशीस असेल त्या राशीचा उच्चार करावा) शेषेषु ग्रहेषु यथायथं राशिस्थानस्थितेषु सत्सु

शुभनामयोगे शुभकरणे एवंगुण विशेषण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः श्रुतिस्मृति पुराणोक्तफलप्राप्त्यर्थं अस्माकं सकुटुंबानां सपरिवाराणां क्षेमस्थैर्य-आयुरारोग्यैश्वर्यप्राप्त्यर्थं सकलपीडापरिहारार्थं मनेप्सितं सकलमनोरथसिद्धयर्थं श्रीसिद्धिविनायक देवताप्रीत्यर्थं यथाज्ञानेन यथामीलितोपचारद्रव्यैः ध्यानावाहनादि षोडशोपचारपूजां पुराणोक्तमंत्रेण करिष्ये । तत्रादौ निर्विघ्नतासिद्धयर्थं महागणपतिस्मरणं तथा शरीरशुद्धयर्थं षडंगन्यासं कलश-शंख-घंटा पूजनं च करिष्ये (उजव्या हातात पाणी घेऊन ताम्हनात सोडावे.)

गणानां त्वा शौनको गृत्समदो गणपतिर्जगती गणपतिस्मरणे विनियोगः ।

ॐ गणानां त्वां गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम् ।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम् ॥

वक्रतुण्ड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥

महागणपतये नमो नमः ।

(वरील मंत्र म्हणून गणपतीला हात जोडून प्रार्थना करावी.)

पृथ्वीति मंत्रस्य मेरुपृष्ठऋषिः कुर्मो देवता सुतलं छंदः आसने विनियोगः ।

ॐ पृथ्वि त्वया धृता लोका देवि त्वं विष्णुना धृता ।
त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरु चासनम् ॥
इति आसनम् विधाय ।

ॐ अपसर्पन्तु ते भूता ये भूता भूमिसंस्थिताः ।
ये भूता विघ्नकर्तारस्ते गच्छन्तु शिवाज्ञया ॥
अपक्रामन्तु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम् ।
सर्वेषामविरोधेन पूजाकर्म समारभे ॥
इति भूतोत्सादनं कृत्वा षडङ्गन्यासः ।

ॐ भूर्भुवः स्वः हृदयाय नमः (छातीला उजवा हात लावावा.)

ॐ भूर्भुवः स्वः शिरसे स्वाहा (मस्तकाला हात लावावा)

ॐ भूर्भुवः स्वः शिखायै वषट् (शेंडीला हात लावावा)

ॐ भूर्भुवः स्वः कवचाय हुम् (हाताची ओंजळ करून छातीकडे तीन वेळा फिरवावी.)

ॐ भूर्भुवः स्वः नेत्रत्रयाय वौषट् (डोळे व भुवईच्या मध्ये हात लावावा)

ॐ भूर्भुवः स्वः अस्त्राय फट् (टाळी वाजवावी) इति दिग्बंधः।

कलशपूजा– आपल्या डाव्या बाजूस पूजेसाठी भरून ठेवलेला जो तांब्या असेल त्यावर हात ठेवून म्हणावे –

कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः ।
मूले तत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः ॥
कुक्षौ तु सागराः सर्वे सप्तद्वीपा वसुंधरा ।
ऋग्वेदोथ यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः ॥

अंगैश्च सहिताः सर्वे कलशं तु समाश्रिताः ।
अत्र गायत्री सावित्री शांतिपुष्टिकरी तथा ॥
आयान्तु देवपूजार्थं दुरितक्षयकारकाः ॥
गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति ।
नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन् संनिधिं कुरु ॥
कलशदेवताभ्यो नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं समर्पयामि

(असे म्हणून कलशाला गंध, अक्षता व फूल वाहावे.)

**शंखपूजा**—( आपल्या उजव्या बाजूस ठेविलेल्या शंखास हातात घेऊन स्नान घालावे व पाणी भरून ठेवावा आणि गंध फूल वाहावे.)

शंखं चंद्रार्कदैवत्यं वरुणं चाधिदैवतम् ।
पृष्ठे प्रजापतिश्चैव अग्रे गंगा सरस्वती ॥
ॐ पांचजन्याय विद्महे पावमानाय धीमहि ।
तन्नः शंखः प्रचोदयात् । शंखाय नमः गंधपुष्पं समर्पयामि ।

**घंटापूजनम्**—(आपल्या डाव्या बाजूस ठेविलेल्या घंटेला उजव्या हातात घेऊन स्नान घालावे व वस्त्राने पुसून जागेवर ठेवावी.)

आगमार्थं तु देवानां गमनार्थं च रक्षसाम् ।
कुर्वे घण्टारवं तत्र देवताह्वानलक्षणम् ॥

घंटायै नमः । गंधाक्षतपुष्पं समर्पयामि । हरिद्रां कुंकुमं सौभाग्य द्रव्यं समर्पयामि (असे म्हणून गंध, फूल, हळद, कुंकू वाहावे. घंटा वाजवावी.)

**दीपपूजनम्**—(समईस गंध, फूल, अक्षता, हळद, कुंकू वाहून नमस्कार करावा)

दीपदेवताभ्योनमः । गंधाक्षतपुष्पं समर्पयामि । हरिद्रा कुंकुमं सौभाग्यद्रव्यं समर्पयामि (असे म्हणून पुढील प्रार्थना करावी)

भो दीप ब्रह्मरूपस्त्वं ज्योतिषां प्रभुरव्ययः ।
यावत् पूजासमाप्तिः स्यात् तावत्त्वं सुस्थिरो भव ॥
(दिव्याला नमस्कार करावा व गंधफूल हळदकुंकू वहावे.)
प्रोक्षणः– अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ।
यः स्मरेत् पुंडरीकाक्षं स बाह्याभ्यन्तरः शुचिः ॥

आत्मानं प्रोक्ष्य, पूजाद्रव्याणि च संप्रोक्षेत् (असे म्हणून कलशांतील पाणी पळीत घेऊन तुळशी पत्राने सर्व पूजासाहित्यावर प्रोक्षण करावे व नंतर आपल्या स्वतःवर प्रोक्षण करावे.)

यानंतर हातात अक्षता घेऊन ध्यान करावे.

## विष्णुध्यान

शान्ताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशम् ।
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम् ।
लक्ष्मीकान्तं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यम् ।
वन्दे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥

## शिवध्यान

ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसं ।
रत्नाकल्पोज्ज्वलांगं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नं ।
पद्मासीनं समन्तात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिं वसानं ।
विश्वाद्यं विश्ववंद्यं निखिलभयहरं पंचवक्त्रं त्रिनेत्रम् ॥

## सूर्यध्यान

ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ती
नारायणः सरसिजासनसंनिविष्टः ।
केयूरवान् मकरकुण्डलवान् किरीटी
हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः ॥

**देवीध्यान**

नमो देव्यै महादेव्यै शिवायै सततं नमः।
नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणतः स्मताम् ॥

**गणपतिध्यान**

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥
(असे म्हणून मूर्तीला फुले व दूर्वा अर्पण कराव्यात.)

**आवाहन**– आगच्छ देव देवेश तेजोराशे जगत्पते।
क्रियमाणां मया पूजां गृहाण सुरसत्तम ॥

श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः । आवाहनार्थे दूर्वांकुरं समर्पयामि ॥ (असे म्हणून गणपतीला दूर्वा अर्पण कराव्या.)

**पाद्य**– सर्वतीर्थसमुद्भूतं पाद्यं गन्धादिभिर्युतम् ।
विघ्नराज गृहाणेदं भगवन् भक्तवत्सल ॥
श्रीसिद्धिविनायकाय नमः । पाद्यं समर्पयामि ।
(असे म्हणून दूर्वांकुराने गणपतीचे पायावर पाणी शिंपडावे.)

**अर्घ्य**– अर्घ्यं च फलसंयुक्तं गंधपुष्पाक्षतैर्युतम् ।
गणाध्यक्ष नमस्तुभ्यं गृहाण करुणानिधे ।

श्रीसिद्धिविनायकाय नमः। अर्घ्यं समर्पयामि । (पळीत पाणी घेऊन त्यांत गंध फूल अक्षता व दूर्वांकुर घालून आपण गणपतीचे हातावर ते सोडीत आहोत अशी भावना करून पुढील ताम्हनांत सोडावे.)

**आचमन**–विनायक नमस्तुभ्यं त्रिदशैरभिवंदित ।
गंगोदकेन देवेश शीघ्रमाचमनं कुरु । श्रीसिद्धिविनायकाय नमः । आचमनीयं समर्पयामि। (वरील मंत्र म्हणून दूर्वेला पाणी लावून ती देवाचे मुखाजवळ धरावी व मग पायावर अर्पण करावी.)

**स्नान**—गंगा सरस्वती रेवा पयोष्णी यमुना जलैः ।
स्नापितोऽसि मया देव तथा शान्ति कुरुष्व मे ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः। स्नानं समर्पयामि। (असे म्हणून दूर्वा पाण्यांत बुडवून गणपतीचे पायाजवळ ते पाणी शिंपडावे.)

## पंचामृत स्नान

**पयस्नान**—कामधेनोः समुद्भूतं देवर्षिपितृतृप्तिदम् ।
पयो ददामि देवेश स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । पयस्नानं समर्पयामि । शुद्धोदक-स्नानं समर्पयामि । (असे म्हणून प्रथम दूर्वांकुराने गणपतीच्या पायावर दूध शिंपडावे व नंतर पाणी शिंपडावे.)

**दधिस्नान**—ॐ दधिक्राव्णो अकारिषं जिष्णोरश्वस्य वाजिनः ।
सुरभिनो मुखा करत्प्रण आयूंषि तारिषत् ॥
चंद्रमंडलसंकाशं सर्वदेवप्रियं दधि ।
स्नानार्थं ते मया दत्तं प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय दधिस्नानं समर्पयामि (असे म्हणून वरील-प्रमाणे दही व नंतर पाणी घालावे.)

**घृतस्नान**—ॐघृतं मिमिक्षे घृतमस्य योनिर्घृतेश्रितो घृतम्वस्यधाम।
अनुष्वधमावह मादयस्व स्वाहाकृतं वृषभवक्षिहव्यम् ॥
आज्यं सुराणामाहारमाज्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ।
आज्यं पवित्रं परमं स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः घृतस्नानं समर्पयामि। शुद्धोदकस्नानं समर्पयामि। (प्रथम तूप व मागाहून पाणी घालावे.)

**मधुस्नान**— ॐ मधुवाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः । माध्वीर्नः संत्वोषधीः । मधु नक्तमुतोषसी मधुमत्पार्थिवं रजः ।

मधुद्यौरस्तु नः पिता । मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः ।
माध्वीर्गावो भवन्तु नः ॥

सर्वौषधिसमुत्पन्नं पीयूषसदृशं मधु ।
स्नानार्थं ते प्रयच्छामि गृहाण परमेश्वर ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । मधुस्नानं समर्पयामि । शुद्धोदकस्नानं समर्पयामि । (प्रथम मध व मागाहून पाणी घालावे.)

**शर्करास्नान**—ॐ स्वादुः पवस्व दिव्याय जन्मने स्वादुरिंद्राय सुहवीतुनाम्ने । स्वादुर्मित्राय वरुणाय वायवे बृहस्पतये मधुमाँ अदाभ्यः ॥

इक्षुदंडसमुद्भूतदिव्यशर्करया हरिम् ।
स्नापयामि सदा भक्त्या प्रीतो भव सुरेश्वर ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः शर्करास्नानं समर्पयामि ।
शुद्धोदकस्नानं समर्पयामि ॥

सुगंधिद्रव्यसंमिश्रं तैलं सह हरिद्रया ।
दिव्यं सुरभि पुष्पोत्थं गृहाणोद्वर्तनं विभो ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । मांगलिकस्नानं समर्पयामि (देवाला दूर्वांकुराने सुगंधी द्रव्य, अत्तर वगैरे वाहून ऊन पाण्याने स्नान घालावे. ऊन पाणी घालताना पुढील मंत्र म्हणावा.)

नानातीर्थादिहृतं यत्नात्तोयमुष्णं मया कृतम् ।
मंगलं गात्रसुखदं स्नानार्थं देव गृह्यताम् ॥

**गंधोदकस्नानः**—ॐ गंधद्वारां दुराधर्षां नित्यपुष्टां करीषिणीम् ।
ईश्वरी सर्वभूतानां तामिहोपह्वये श्रियम् ॥
कर्पुरैलासमायुक्तं सुगंधिद्रव्यसंयुतम् ।
गंधोदकस्नानं समर्पयामि शुद्धोदकस्नानं समर्पयामि ।

(संध्येच्या पळीत पाणी व गंध घालून ते पाणी दूर्वांकुराने वाहावे. नंतर साधे पाणी घालावे )

श्रीसिद्धिविनायकाय नमः सर्वोपचारार्थे गंधाक्षतपुष्पं दूर्वांकुरं समर्पयामि। हरिद्रा कुंकुमं समर्पयामि।(हे मंत्र म्हणून गणपतीला गंध, अक्षता, फूल व दूर्वांकुर वाहावे.)

श्रीसिद्धिविनायकाय नमः धूपं समर्पयामि। दीपं दर्शयामि। नैवेद्यार्थे पंचामृतशेष नैवेद्यं समर्पयामि। (वरील मंत्र म्हणून उदबत्ती निरांजन ओवाळावे. नंतर पंचामृताच्या वाटीभोवती पाणी फिरवावे व नंतर नैवेद्य दाखवावा.)

ॐ प्राणाय स्वाहा। ॐ अपानाय स्वाहा। ॐ व्यानाय स्वाहा। ॐ उदानाय स्वाहा। ॐ समानाय स्वाहा। ॐ ब्रह्मणे स्वाहा। उत्तरापोशनं हस्तमुखप्रक्षालनं समर्पयामि। मुखवासार्थे पूगीफलं तांबूलं सुवर्णनिष्क्रयदक्षिणां समर्पयामि। श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः। गंधपुष्पं समर्पयामि। नमस्करोमि (प्रत्येक मंत्र म्हणून पाणी सोडावे. विड्याच्या दोन पानांवर पैसा सुपारी ठेवून त्यावर पाणी सोडावे. नंतर मंत्रपुष्प म्हणावे व दूर्वा फुले वाहावी

अनेन कृतपूजनेन तेन श्रीसिद्धिविनायक देवताः प्रीयन्ताम्।

उत्तरे निर्माल्यं विसृज्य अभिषेकं कुर्यात्।

(असे म्हणून पूर्वी वाहिलेली दूर्वा फुले काढून उत्तरेकडे ठेवावी आणि महाभिषेकाला श्रीसूक्ताने किंवा पुरुषसूक्ताने सुरवात करावी

१) श्रीसूक्त अगर पुरुष सूक्त

२) गणपति अथर्वशीर्ष २१ वेळा म्हणावे

३) गणपतिस्तोत्रही म्हणावे. प्रणम्य शिरसा देवं ... गणेशस्य प्रसादतः

बलाय श्रियै यशसेऽन्नाद्याय ॐ भूर्भुवः स्वः अमृताभिषेकोऽस्तु। शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु(असे म्हणून गणपतीवर पाणी शिंपडावे)

श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः। अभिषेकस्नानं समर्पयामि शुद्धोदकस्नानम् समर्पयामि। अनन्तरं शंखोदकस्नानं कृत्वा अभ्यं-

गस्नानं कुर्यात् । काश्मीररागरुकस्तुरीकर्पूरमल्यान्वितं उद्वर्तनं मया दत्तं स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥ मांगलिकस्नानं उष्णोदकस्नानं कुर्यात् (नंतर शंखातील पाणी दूर्वांकुरांनी शिंपडावे नंतर सुवासिक तेल अत्तर दूर्वांकुरांनी लावावे. नंतर गरम पाणी दूर्वांकुरांनी शिंपडावे)

वस्त्र:–रक्तवस्त्रयुगं देव देवतार्हं सुमंगलम् ।
सर्वप्रद ग्रहाणेदं लंबोदर हरात्मज ॥

(असे म्हणून कापसाचे किंवा प्रत्यक्ष वस्त्र वाहावे.)

जानवे–रजतं ब्रह्मसूत्रं च कांचनं चोत्तरीयकं । विनायक नमस्तेस्तु गृहाण सुरवंदितम् ॥ श्री सिद्धिविनायकाय नमः । असे म्हणून जानवे अर्पण करावे.

चंदन–श्रीखंडचन्दनं दिव्यं गंधाढ्यं सुमनोहरम् ।
विलेपनं सुरश्रेष्ठ चन्दनं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः चंदनं समर्पयामि । (वरील मंत्रांनी गंध लावावे.)

अक्षता:– अक्षतास्तंडुला: शुभ्रा: कुंकुमेन विराजिता ।
मया निवेदिता भक्त्या गृहाण परमेश्वर ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । अक्षतान् समर्पयामि (वरील मंत्रांनी अक्षता वाहाव्या.)

हळद:–हरिद्रा स्वर्णवर्णाभा सर्वसौभाग्यदायिनी ।
सर्वालंकार मुख्यादि देवि त्वं प्रतिगृह्यताम् ।

श्रीसिद्धिविनायकाय नमः हरिद्रां समर्पयामि (वरील मंत्राने हळद वाहावी.)

कुंकू:–हरिद्राचूर्णसंयुक्तं कुंकुमं कामदायकम् ।
वस्त्रालंकरणं सर्वं देवि त्वं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः कुंकुमं समर्पयामि । (वरील मंत्राने कुंकू वाहावे.)

**काजळ**— कज्जलं कामदं रम्यं कामिनीकामसंभवम् । नेत्रयोः भूषणार्थाय कज्जलं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीदेव्यै नमः कज्जलं समर्पयामि (एका विड्याच्या पानावर पुसट तुपाचे बोट लावून ते पान समईच्या ज्योतीवर धरावे व जे काजळ मिळेल ते देवाला वाहावे.)

**शेंदूर**—उदितारुणसंकाशं जपाकुसुमसन्निभम् ।
सीमन्तभूषणार्थाय सिंदूरं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीदेव्यै नमः सिंदूरं समर्पयामि (वरील मंत्राने देवाला शेंदूर वाहावा.)

**परिमल द्रव्ये**—ज्योत्स्नापते नमस्तुभ्यं नमस्ते विश्वरूपिणे ।

नाना परिमल द्रव्याणि समर्पयामि (असे म्हणून अर्गजा, अष्टगंध वगैरे सुगंधी द्रव्ये अर्पण करावी.)

**पुष्पे**—माल्यादीनि सुगंधीनि मालत्यादीनि वै प्रभो ।
मया हृतानि पूजार्थं पुष्पाणि प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । विविधपुष्पाणि समर्पयामि ।

(वरील मंत्रांनी फुले अर्पण करावीत.)

**दूर्वा** – गणपतीला २१ दूर्वा वाहण्याची पद्धत आहे. खालील प्रत्येक नांव उच्चारून दोन दोन दूर्वा वाहाव्या व राहिलेली शेवटो एक वाहवी.

१) गणाधिपाय नमः २) उमापुत्राय नमः ३) अघनाशनाय नमः ४) एकदंताय नमः ५) इभवक्त्राय नमः ६) मूषकवाहनाय नमः ७) विनायकाय नमः ८) ईशपुत्राय नमः ९) सर्वसिद्धिप्रदायकाय नमः १०) कुमारगुरवे नमः ११) श्रीसिद्धिविनायकाय नमः

एवं दूर्वांकुरान् समर्पयामि ।

**धूप** – वनस्पतिरसोद्भूतो गंधाढ्यो गंध उत्तमः ।
आघ्रेयः सर्वदेवानां धूपोऽयं प्रतिगृह्यताम् ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः धूपं समर्पयामि । (देवाला उदबत्ती, धूप दाखवावा.)

**दीप**—आज्यं च वर्ति संयुक्तं वह्निना योजितं मया ।
दीपं गृहाण देवेश ममाज्ञानं निवारय ।।

श्रीसिद्धिविनायकाय नमः दीपं दर्शयामि ( देवाला तुपातील फुलवात नीरांजनात ठेवलेली असेल त्या नीरांजनाने ओवाळावे.)

**नैवेद्य**—नैवेद्यं गृह्यतां देव भक्ति मे ह्यचलां कुरु ।
ईप्सितं मे वरं देहि परत्रे च परां गतिम् ।।
शर्कराखंडखाद्यानि दधिक्षीरघृतानि च ।
आहारं भक्ष्यभोज्यं च नैवेद्यं प्रतिगृह्यताम् ।।

श्रीसिद्धिविनायकाय नमः । नैवेद्यं समर्पयामि ( देवाला गूळ-खोबरे, मोदक, पंचखाद्य, दूध वगैरे वस्तूंपैकी एखादी नैवेद्यास ठेवावी.)

ॐ प्राणाय स्वाहा । ॐ अपानाय स्वाहा । ॐ व्यानाय स्वाहा ।
ॐ उदानाय स्वाहा । ॐ समानाय स्वाहा । ॐ ब्रह्मणे स्वाहा ।

(या मंत्राने नैवेद्य दाखवावा पुन्हा वरीलप्रमाणे मंत्र म्हणून पुन्हा नैवेद्य दाखवावा.)

उत्तरापोशनं समर्पयामि । हस्तमुखप्रक्षालनं समर्पयामि । करोद्वर्तनार्थे चंदनं समर्पयामि (प्रत्येक मंत्र म्हणून संध्येच्या पळीने ताम्हनात पाणी सोडावे व अनामिकेने गंध लावावे.)

**तांबूल**—पूगीफलं महद्दिव्यं नागवल्या दलैर्युतम् ।
कर्पुरैलासमायुक्तं तांबूलं प्रतिगृह्यताम् ।।
श्रीसिद्धिविनायकाय नमः तांबूलं समर्पयामि ।

(विडयाच्या दोन पानावर सुपारी व पैसा ठेवून त्यावर उदक सोडावे.)

२

**फल** :–फलेन फलितं सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ।

तस्मात् फलप्रदानेन सफला:स्युर्मनोरथाः ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः विविधफलानि नारीकेलंफलं च समर्पयामि, नमस्करोमि, (असे म्हणून देवापुढे नारळ कुंकू लावून ठेवावा, व केळे, पेरू, डाळिंब वगैरे असतील ती फळे ठेवावी व त्यावर पाणी सोडावे. )

**महानीरांजन** – कर्पूर निर्मितं रम्यं स्वर्णपात्रे निवेशितम् ।

नीरांजनं गृहाणेदं चंद्रकान्तिहरं प्रभो ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः महानीरांजनदीपं समर्पयामि । (वरील मंत्रांनी नीरांजन ओवाळावे.)

**कापूर**–कर्पूरगौरं करुणावतारं संसारसारं भुजगेंद्रहारम् ।

सदा वसंतं हृदयारविंदे भवं भवानीसहितं नमामि ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः कर्पूरार्तिक्यदीपं समर्पयामि । नमस्करोमि । (देवाला कापूर लावून ओवाळावे. नमस्कार करावा.) या वेळी आरत्या म्हणाव्यात.

१) सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता ..संकष्टी पावावे निर्वाणी रक्षावे

२) लवथवती विक्राळा......रघुकुलतिलक रामदासा अंतरी

३) दुर्गेदुर्घट हारी ... नरहरि तल्लीन झाला पदपंकज लेशा

**प्रदक्षिणा** — यानि कानि च पापानि जन्मान्तरकृतानि च । तानि तानि विनश्यन्ति प्रदक्षिणपदे पदे ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः प्रदक्षिणाम् समर्पयामि ।

(आपल्याभोवती उजवीकडून डावीकडे वाटोळे फिरावे. )

**नमस्कार** : – नमः सर्वहितार्थाय जगदाधारहेतवे ।

साष्टांगोऽयं प्रणामस्ते प्रयत्नेन मया कृतः ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । नमस्कारं समर्पयामि । (देवाला साष्टांग नमस्कार घालावा.)

**पुष्पांजलि** — पुढीलमंत्राने गंधाक्षतासह ओंजळीत फुले घेऊन देवाचे चरणावर अर्पण करावीत.

ॐ यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् । तेह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥

नमस्ते विघ्नसंहर्त्रे नमस्ते ईप्सितप्रद ।
नमस्ते देवदेवेश नमस्ते गणनायक ॥

श्रीसिद्धिविनायकाय नमः । पुष्पांजलिं समर्पयामि ।

यानंतर राष्ट्रीय प्रार्थना म्हणावी.

ॐ यज्ञेन यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् । तेह नाकं महिमानः सचंत यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः । ॐ राजाधिराजाय प्रसह्यसाहिने नमो वयं वैश्रवणाय कुर्महे । स मे कामान् कामकामाय मह्यं कामेश्वरो वैश्रवणो ददातु । कुबेराय वैश्रवणाया महाराजाय नमः । ॐ स्वस्ति साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यमाधिपत्यमयं समंतपर्यायी स्यात् सार्वभौमः सार्वायुष आन्तादापरार्धात् पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराळिति । तदप्येष श्लोकोऽभिगीतो मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन् गृहे । आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ।

तीर्थप्राशन :–

अकालमृत्यु हरणं सर्वव्याधिविनाशनम् ।
देवपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ॥

अनेन यथाज्ञानेन, यथामिलितोपचारैः कृतपूजनेन श्रीभगवान् श्रीसिद्धिविनायकमहागणपतिः प्रीयताम् ॥

श्रीगजाननार्पणमस्तु ।

येणेप्रमाणे गणेशपूजाविधि समाप्त झाला.

## श्रीगणेशाची उत्तरपूजा

कुलाचाराप्रमाणे ज्या दिवशी श्रीगणपतीचे विसर्जन करावयाचे असते त्यावेळी करावयाच्या उत्तरपूजेचा विधि.)

दुपारी भोजनानंतर पुन्हा स्नान करून, सोवळे नेसून पाटावर बसून आचमन करावे व पुढील संकल्प करावा.

अद्येत्यादिपूर्वोच्चरित एवंगुणविशेषण विशिष्टायां शुभपुण्य-तिथौ मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं श्रीपार्थिवमहा गणपतिदेवताप्रीत्यर्थं पंचोपचारैः उत्तरपूजनं करिष्ये । असे म्हणून उदक सोडावे. नंतर गंध, पुष्प, धूप, दीप नैवेद्य हे उपचार पूर्वी पूजाप्रयोगात सांगितलेल्या मंत्रांनी अर्पण करावेत. उदा.

श्रीपार्थिवमहागणपतये नमः । विलेपनार्थे चंदनं समर्पयामि ।
श्रीपार्थिवमहागणपतये नमः । पूजार्थे पुष्पाणि समर्पयामि ।
श्रीपार्थिवमहागणपतये नमः धूपं समर्पयामि ।
श्रीपार्थिवमहागणपतये नमः । दीपं समर्पयामि ।

श्रीपार्थिवमहागणपतये नमः । नैवेद्यार्थे खाद्यनैवेद्यं समर्पयामि

नंतर विडा, दक्षिणा, फळ ठेवावे. आरती मंत्रपुष्प, दूर्वासमर्पण इ. झाल्यावर प्रार्थना करावी शेवटी अनेन यथाज्ञानेन यथा मिलितोपचारैः कृतउत्तरपूजनेन भगवान् श्रीपार्थिवमहागणपतिः प्रीयताम् । असे म्हणून उदक सोडावे.

कुटुंबातील सर्वांनी गणपतीला गंध-फूल दूर्वा वहाव्यात. नमस्कार करावा. देवाची विशेष प्रार्थना हात जोडून करावी. ती अशी " देवा गणराया । आपली पूजा कशी करावी, कोणता उपचार केव्हा कसा करावा हे मला समजत नाही. मी आपले चरणांचा दास आहे. जे अधिक उणे झाले असेल ते पूर्ण करून

घ्या. माझे हातून माझ्या मुलाबाळांचे हातून घडलेल्या अपराधांची क्षमा करून माझे सहपरिवार रक्षण करावे. मी सर्वस्वी आपला दास आहे. माझ्या संकटांचा परिहार करून माझ्या उद्योगधंदयातील भासणाऱ्या अडचणी दूर करून त्यात मला यश लाभ व्हावा, आणि प्रतिवर्षी असेच आनंदाने येऊन आमचे हातून सेवा करून घ्यावी. अधिक काय सांगू ? माझा सर्वभाव आपण जाणता आहा. कृपादृष्टि ठेवा हीच प्रार्थना ! " मंगलमूर्ति मोरया । अशी गर्जना करावी. नंतर पुढील मंत्रांनी देवावर विसर्जनाच्या अक्षता वाहाव्या. तो मंत्र असा

यान्तु देवगणाः सर्वे पूजामादाय पार्थिवीम् ।
इष्टकामप्रसिद्ध्यर्थं पुनरागमनाय च ॥

अक्षता घातल्यावर मूर्ति जरा सरकवावी. नंतर इष्टमित्र, कुटुंबीय मंडळीसह ती मूर्ति जलाशय, नदी, समुद्र इत्यादि पवित्र स्थळी पोहोचवावी. जाताना देवाबरोबर दही-भात, पोहे इ. शिदोरी म्हणून देण्याचा प्रघात आहे. घरी परत आल्यावर " सुखहर्ता दुःखहर्ता " ही आरती म्हणावी. पूजा आपण स्वतःच केली असेल तर देवापुढील विडा दक्षिणा ब्राह्मणाला द्यावी. किंवा सत्कार्यार्थ अर्पण करावी.

इति पूजाविधिः समाप्तः ।

## संध्याकाळी करावयाची धूपारती

संध्याकाळी दिवे लावल्यानंतर गणपतीची पूजा करावी. स्नानादि कर्मे करावी. सोवळे नेसावे.आचमन करून मागे सांगितल्याप्रमाणे २४ नावांचा उच्चार करावा. “ अद्येत्यादि पूर्वोच्चरित वर्तमान एवंगुण विशेषण विशिष्टायां शुभ पुण्यतिथौ मम आत्मनः श्रुति-स्मृति पुराणोक्त फल प्राप्त्यर्थं श्रीसिद्धिविनायक देवताप्रीत्यर्थं सायंकाले पंचोपचारैः पूजनमहं करिष्ये” असे म्हणून पाणी सोडावे आणि मग गंधपूजा करण्यास सुरवात करावी. मागे सांगितल्या-प्रमाणे पूजाविधि करावा.

श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः विलेपनार्थे चंदनं समर्पयामि (गंध लावावे)

श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः पुष्पाणि समर्पयामि (फुले वाहावीत) श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः धूपं समर्पयामि (उदबत्ती ओवाळावी) श्रीसिद्धिविनायक देवताभ्यो नमः दीपं समर्पयामि (निरांजन ओवाळावे) श्रीसिद्धिविनायक देवताभ्योनमः नैवेद्यं समर्पयामि (नैवेद्य दाखवावा)

एवढे झाले की गणपतीला आरती ओवाळावी. प्रदक्षिणा घालावी. (स्वतः भोवती) नमस्कार करावा व हातात फुले घेऊन ती शुद्ध अन्तःकरणाने गणपतीला वाहावीत.

## गणपतीची आरती

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी पुरवी प्रेम कृपा-जयाची। सर्वांगी सुंदर,उटिशेंदुराची कंठी झळके माळ मुक्ताफळांची
जयदेव जयदेव जय मंगलमूर्ति दर्शनमात्रे मनःकामना पुरती ।। ध्रु ॥

रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा । चंदनाची उटि कुंकुमकेशरा हिरेजडित मुगुट शोभतो बरा । रुणझुणती नुपुरे चरणी घागरिया ॥ जय ॥ लंबोदर पितांबर फणिवरबंधना । सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना । दास रामाचा वाट पाहे सदना संकष्टी पावावे निर्वाणी रक्षावे सुरवरवंदना । जयदेव जयदेव जय मंगलमूर्ति । दर्शनमात्रें मनःकामना पुरती ॥ ३ ॥

## गणपतीची आरती

नाना परिमल दूर्वा शेंदुर शमिपत्रे । लाडू मोदक अन्ने परिपूरित पात्रे ऐसे पूजन केल्या बीजाक्षरमंत्रे । अष्टहि सिद्धि नवनिधि देसी क्षणमात्रे ॥ १ ॥ जयदेव जयदेव जयमंगलमूर्ति । तुझे गुण वर्णाया मज कैंची स्फूर्ति ॥ जय० ॥ धृ. ॥ तुझे ध्यान निरंतर जे कोणी करिती । त्यांची सकलही पापे विघ्नेही हरती । वाजी वारण शिबिका सेवक सुत युवती । सर्वहि पावुनि अंती भवसागर तरती। जयदेव ० ॥ २ ॥ शरणांगत सर्वस्वे भजती तव चरणी । कीर्ति तयांची राहे जोवरि-शशि-तरणी । त्रैलोक्यी ते विजयी अद्‌भुत हे करणी । गोसावीनंदन रत नामस्मरणी । जयदेव जय ॥ ३ ॥

## महागणपतिस्तोत्रम्

श्रीगणेशाय नमः ।। योगं योगविदां विधूत विविधव्यासंगशुद्धाशयप्रादुर्भूतसुधारसप्रसृमर ध्यानास्पदाध्यासिनाम् । आनन्दप्लवमानबोधमधुरामोदच्छटामेदुरं तं भूमानमुपास्महे परिणतं दंतावलास्यात्मना ॥ १ ॥ तारश्रीपरशक्तिकामवसुधारूपानुगं यं विदुस्तस्मै स्तात्प्रणतिर्गणाधिपतये यो रागिणाभ्यर्थ्यते । आमंत्र्य प्रथमं वरेति

वरदेत्यातैन सर्व जनं स्वामिन्मे वशमानयेति सततं स्वाहादिभिः पूजितः ॥ २॥ कल्लोलांचलचुंबितांबुदतताविक्षुद्रवांभोनिधी द्वीपे रत्नमये सुरद्रुमवनामोदैकमेदस्विनि । मूले कल्पतरोर्महामणिमये पीठेऽक्षरांभोरुहे षट्कोणा कलितत्रिकोणरचना सत्कर्णिकेऽमुं भजे ॥ ३॥ चक्रप्रास रसालकामुकगदासद्बीजपूर द्विजव्रीह्यग्रोत्पलपाश-पंकजकरं शुण्डाग्रजाग्रद्घटम् । आश्लिष्टं प्रियया सरोजकरया रत्नस्फुरद्भूषया माणिक्यप्रतिमंमहागणपतिं विश्वेशमाशास्महे॥४॥ दानांभः परिमेदुरप्रसृमरव्यालंबिरोलंबभृत्सिंदुरारुण गण्डमण्डल-युगव्याजात्प्रशस्तिद्वयम् ।त्रैलोक्येष्टविधानवर्णसुभगं यः पद्मरागोपम धत्ते स श्रियमातनोतु सततं देवो गणानां पतिः॥५॥भ्राम्यन्मंदरघूर्णनापरवशक्षीराब्धिवीचिच्छटासच्छायाश्चलचामरव्यतिकर श्रीगर्व-सर्वंकषाः। दिक्कांताघनसारचंदनरसासाराः श्रयंतां मनः स्वच्छंद-प्रसर प्रलिप्तवियतो हेरंबदंतत्विषः॥ ६ ॥ मुक्ताजालकरंबितप्रवि-कसन्माणिक्यपुंजच्छटाकांताः कंबुकदंबचुंबितवना भोगप्रवालोपमाः॥ ज्योत्स्नापूरतरंगमंथरत्संध्यवयस्याश्चिरं हेरंबस्य जयंति दंत-किरणाकीर्णाः शरीरत्विषः ॥ ७ ॥ शुण्डाग्राकलितेन हेमकलशेना-वर्जितेन क्षरन्नानारत्नचयेन साधकजनान्संभावयन् कोटिशः। दानामोदविनोदशलुब्धमधुपप्रोत्सारणाविर्भवत्कर्णांदोलन खेलनो विजयते देवो गणग्रामणीः ॥ ८ ॥ हेरंबं प्रणमामि यस्य पुरतः शांडिल्यमुले श्रिया बिभ्रत्यांबुरुहे समं मधुरिपुस्ते शंखचके वहन्। न्यग्रोधस्य तले सहाद्रिसुतया शंभुस्तथा दक्षिणे बि॰भाणः परशुं त्रिशूलमितया देव्या धरण्या सह ॥ ९॥ पश्चात्पिप्पलमाश्रितो रतिपतिर्देवस्य रत्योपले बिभ्रत्यासममैक्षवं धनुरिषून्पौष्पान्वहन्पंच च । वामे चक्रगदाधरःस भगवान्क्रोडप्रियंगोस्तलं हस्तोद्यच्छुकशा-लिमंजरिकया देव्या धरण्या सह ॥ १०॥ षट्कोणाश्रिषु षट्सु

षड्गजमुखाः पाशांकुशाभीवरान्बिभ्राणाः प्रमदासखाः पृथुमहाशोणाश्मपुंजत्विषः । आमोदः पुरतः प्रमोदसुमुखौ तं चाभितो दुर्मुखः पश्चात्पार्श्वगतोऽस्य विघ्न इति यो यो विघ्नकर्तेति च ॥ ११ ॥ आमोदादिगणेश्वरप्रियतमास्तत्रैव नित्यं स्थिताः कान्ताश्लेषरसज्ञमंथरदृशःसिद्धिःसमृद्धिस्ततः । कांतिर्या मदनावतीत्यपि तथा कल्पेषु या गीयते सान्या यापि मदद्रवा तदपरा द्राविण्यमूः पूजिताः ॥ १२ ॥ अश्लिष्टौ वसुधेत्यथो वसुमती ताभ्यां सितालोहितौ वर्षंतौ वसु पार्श्वयोर्विलसतस्तौ शंखपद्मौ निधी । अंगान्यन्वथ मातरश्च परितः शक्रादयोऽब्जाश्रयास्तद्वाह्ये कुलिशादयः परिपतत्कालानलज्योतिषः ॥ १३ ॥ इत्थं विष्णुशिवादितत्त्वतनवे श्रीवक्रतुंडाय हुंकाराक्षिप्तसमस्तदैत्यपृतनाव्राताय दीप्तत्विषे । आनंदैकरसावबोधलहरीविध्वस्तसर्वोर्मये सर्वत्र प्रथमानमुग्ध-महसे तस्मै परस्मै नमः ॥ १४ ॥ सेवाहेवाकिदेवासुरनरनिकरस्फारकोटीरकोटिकाटिव्याटीकमानद्युमणिसममणि श्रेणिभावेनिकानाम् । राजन्नीराजनश्रीसखचरणखद्योतविद्योतमानः श्रेयः स्थेयः स देयान्मम विमलदृशो बन्धुरं सिंधुरास्यः ॥ १५ ॥ एतेन प्रगटरहस्यमंत्रमालागर्भेण स्फुटतरसंविदा स्तवेन । यः स्तौति प्रचुरतरं महागणेशं तस्येयं भवति वंशवदा त्रिलोकी ॥ १६ ॥

## सङ्कष्टनाशनगणेशस्तोत्रम्

श्रीगणेशाय नमः ॥ नारद उवाच । प्रणम्य शिरसा देवं गौरीपुत्रं विनायकम् । भक्तावासं स्मरेन्नित्यमायुःकामार्थसिद्धये ॥१॥ प्रथमं वक्रतुंडं च एकदन्तं द्वितीयकम् । तृतीयं कृष्णपिंगाक्षं गजवक्त्रं चतुर्थकम् ॥ २ ॥ लंबोदरं पंचमं च षष्ठं विकटमेव च । सप्तमं विघ्नराजेन्द्रं धूम्रवर्णं तथाष्टमम् ॥३॥ नवमं भालचंद्रं च दशमं

तु विनायकम् । एकादशं गणपतिं द्वादशं तु गजाननम् ॥ ४ ॥ द्वादशैतानि नामानि त्रिसंध्यं यः पठेन्नरः । न च विघ्नभयं तस्य सर्वसिद्धिकरं प्रभो ॥ ५ ॥ विद्यार्थी लभते विद्यां धनार्थी लभते धनम् । पुत्रार्थी लभते पुत्रान्मोक्षार्थी लभते गतिम् ॥ ६ ॥ जपेद्-गणपतिः स्तोत्रं षड्भिर्मासैः फलं लभेत् । संवत्सरेण सिद्धिं च लभते नात्र संशयः ॥ ७ ॥ अष्टभ्यो ब्राह्मणेभ्यश्च लिखित्वा यः समर्पयेत् । तस्य विद्या भवेत्सर्वा गणेशस्य प्रसादतः ॥ ८ ॥

## दूर्वेची महती

ऋषींच्या प्रार्थनेवरून भगवान श्रीगजाननाने अनलासूर नावाच्या दैत्याला भक्षण केले. त्यामुळे देवाच्या अंगाचा दाह होऊ लागला. थंडपणासाठी ऋषींनी, इंद्रादि देवांनी अनेक शीतोपचार केले तरी दाह शमन होईना. नंतर सहज अमृतमयी दुर्वांकूर देवाचे मस्तकावर ठेवला. त्याबरोबर दाह थोडा कमी झाला. दाह शांत होण्यासाठी हजारो ऋषींनी दूर्वांचे भारे आणून देवाचे मस्तकावर ठेवले त्याबरोबर दाह शांत झाला. श्रीगजाननाला स्वास्थ्य लाभले. तेव्हापासून श्रीगजाननाला दूर्वा प्रिय झाली. याकरिता गणेश पूजेत एक तरी दूर्वा असावी. "एका वा एकविंशतिः" स्वच्छ धुवून निवडून प्रत्येक दूर्वेला ३, ५, किंवा ७ दूर्वापत्रे असावी. "विना दुर्वांकुरैः पूजा फलं केनापि नाप्यते" दूर्वा नसेल तर शमीपत्र वहावे. (गणेशपुराण)

---

# विनायकी व संकष्टी चतुर्थी

## चैत्र शुद्ध चतुर्थी

चैत्र शुद्ध चतुर्थीस "नृकेसरी" चतुर्थी असे म्हणतात. याचे कारण मत्स्य व गणेश भागवतात सांगितले आहे.

## चैत्र वद्य चतुर्थी

चैत्र वद्य चतुर्थीस "वसंत चतुर्थी" म्हणतात, या चतुर्थीस शमीक ऋषीचा मुलगा जो वसंत ह्याने वसंत ऋतूतील पुष्पे व श्वेत दूर्वा यांनी श्रीगणेशाची चंद्रोदयी पूजा केली. गणेश त्याला प्रसन्न होऊन त्याने तुझ्या नांवाची चतुर्थी होवो असा त्याला वर दिला. त्याची इच्छा परिपूर्ण केली. असे मेरुकल्पाच्या तृतीय स्तंभकात वर्णिले आहे.

## वैशाख शुद्ध चतुर्थी

वैशाख शुद्ध चतुर्थीस 'परशुवाह' चतुर्थी म्हणतात. जमदग्नीस सहस्रार्जुनाने त्रास देऊन कामधेनु नेल्याचे समजल्यावरून भार्गवरामास राग आला. भार्गवरामाने मयूरपुरी येऊन तपश्चर्या केली. नंतर श्रीगणेश प्रसन्न होऊन भार्गवरामास आपल्या हातातील परशु देऊन त्यास अनेक आशीर्वाद देऊन म्हणाले की हे भार्गवरामा या चतुर्थीस लोक "परशुवाह चतुर्थी" असे म्हणतील व तुलाही लोक 'परशुराम' असे म्हणतील.

## वैशाख वद्य चतुर्थी

वैशाख वद्य चतुर्थीस 'दाशरथी' चतुर्थी असे म्हणतात. याचे कारण रावणापासून आपणांला यश यावे व सीता बंदिवासांतून

सुटावी याकरिता सागरतीरी श्रीरामचंद्राने तप केले व कुष्मांडाची मुळे श्रीगणेशाला अर्पण केली. या मुळातूनच गणपति उत्पन्न होऊन त्याने श्रीरामचंद्रास यश येईल असा वर दिला व ह्या चतुर्थीस 'दाशरथी' चतुर्थी असे लोक म्हणतील असे म्हणाले. कुष्मांड मुळांतून मी निर्माण झालो या करता या चतुर्थीस "कुष्मांडी चतुर्थी असे पण म्हणतील.

## ज्येष्ठ शुद्ध चतुर्थी

ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस "ज्येष्ठराज चतुर्थी" असे म्हणतात. तिचे महत्त्व 'मेरुकल्पा'च्या तृतीय स्तबकातील दुसऱ्या अध्यायात फार मोठे सांगितले आहे.

## ज्येष्ठ वद्य चतुर्थी

ज्येष्ठ वद्य चतुर्थीस "कोकिला" चतुर्थी असे म्हणतात. दक्ष यज्ञात सतीने शिवाची निंदा ऐकल्यावर देह विसर्जन केला. नंतर कोकिलेचा वेष धारण करून ज्येष्ठ वद्य चतुर्थीचे व्रत केले. तेव्हा या दिवशी श्रीगणेशाने चंद्रोदयी प्रसन्न होऊन तिला आशीर्वाद दिला की तुझा महिमा कोकिळा रूपाने फार वंदनीय होईल.

## आषाढ शुद्ध चतुर्थी

आषाढ शुद्ध चतुर्थीस "शयनाख्या" चतुर्थी असे म्हणतात. असे श्रीगणेश भागवतात सांगितले आहे. हिचा कथाभाग असा आहे की, या चतुर्थीस मध्याह्नकाली अंदोल्यावर भगवान् आपल्या सर्व स्त्रियांसह शयन करतात. निद्रिस्त असतांनाच ब्रह्मादिक देवांनी त्यांची संपूर्ण पूजा केली. तेव्हा श्रीगणेश प्रसन्न झाले. व म्हणाले की, आषाढ शुद्ध चतुर्थीस मध्याह्नकाली माझी पूजा करून जो कोणी मला अंदोल्यात घालून भक्तीने निजवील व मी

निद्रिस्त असता माझी पूजा वगैरे समारंभ जो करील त्याला अक्षय्य सुख व संपत्ति व अंती स्वानंदभुवनास नेईन.

### आषाढ वद्य चतुर्थी

आषाढ वद्य चतुर्थीस "पार्वतीवरदा" चतुर्थी म्हणतात. याची कथा रुद्रयामल ग्रंथातील गणेशतंत्रात आहे. पार्वतीच्या पोटी अवतार घेऊन गणपतीने सरस्वतीशी लग्न लावले व नंतर पार्वतीने आपला मुलगा हा मंगलमूर्ति आहे हे जाणून आषाढ शुद्ध चतुर्थीचे शयनाव्रताख्य व्रत सुरू केले.

### श्रावण शुद्ध चतुर्थी

श्रावण शुद्ध चतुर्थीस "प्रबोधिनी" चतुर्थी म्हणतात. मंगल मूर्ति झोपाळ्यावर झोपले असता सर्व देवांनी आपणांस सिंधु दैत्याने फार त्रास दिला म्हणुन इक्षु सागरी भगवान् निद्रिस्त असताना प्रार्थना केली. पण सर्वसाक्षी श्रीगणेश श्रावण शुद्ध चतुर्थीस मध्यान्हकाळी उठून सर्व देवांना म्हणाले की हे देवहो मी गौरीचा मुलगा मयुरेश्वर होऊन सिंधु दैत्यास मारीन. भाद्रपद शुद्ध चतुर्थीस माझा अवतार होईल, काळजी करू नये असे प्रबोधन केले. म्हणून या चतुर्थीस प्रबोधिनी चतुर्थी म्हणतात.

### श्रावण वद्य चतुर्थी

पांडवाचे राज्य गेल्यानंतर वनवास प्राप्त झाल्यावर पुन्हा राज्यपद व वैभव प्राप्त होण्याकरता श्रीकृष्णांनी धर्मराजाला श्रावणमास कृष्णपक्षातील "संकटनाशिनी" हे चतुर्थीचे व्रत स्त्रीसहित करण्यास सांगितले व त्या योगाने धर्मराजास गतवैभव पुन्हा प्राप्त झाले. म्हणून या चतुर्थीस "संकटनाशिनी" असे म्हणतात.

## भाद्रपद शुद्ध चतुर्थी

भाद्रपद शुद्ध चतुर्थीचे नामाभिधान "वरद चतुर्थी" असे आहे. श्रीगणेशाने सर्व देवांस बंदीतून सोडवून सर्वांस तुमच्या कार्यात विघ्ने येणार नाहीत असा वर दिला. ब्रह्मा विष्णू महेशादि देवांनी गणेशजन्मतिथीचे उपोषण केलें व गणेशाची पार्थिवमूर्ति करून पूजन केले. गणेशांनी त्यांची भक्ति जाणून प्रत्यक्ष प्रकट होऊन अनेक वर दिले म्हणून शुक्ल चतुर्थीस "वरद चतुर्थी असे लोक म्हणोत हा आशीर्वाद दिला.

## भाद्रपद वद्य चतुर्थी

भाद्रपद कृष्ण चतुर्थीस "अन्नपूर्णा चतुर्थी" असे म्हणतात. अन्नपूर्णेने आरल्यास पार्वतीने शापित केले सबब विनायकाचे व्रत करून मदतीस यावे याकरता वद्य चतुर्थी केली. तेव्हा वद्य चतुर्थीस गणनाथ प्रसन्न होऊन तू जगद्‌वंद्य व मला प्रिय अशी होशील असे सांगून आजपासून या चतुर्थीस "अन्नपूर्णा चतुर्थी असें लोक म्हणतील. ही चतुर्थी चंद्रोदय व्यापिनी असावी.

## आश्विन शुद्ध चतुर्थी

आश्विन शुद्ध चतुर्थीस "मंदार चतुर्थी" म्हणतात. मंदाराने तपश्चर्या करून वर मागून घेतला की माझ्याच नावाची ही चतुर्थी असावी. या चतुर्थीचा शास्त्राधार वरद चतुर्थीसारखाच. मंदाराच्या झाडाखाली बसून मध्याह्नकाली मोरेश्वर मूर्तीची पूजा केल्यास इच्छितफल गणेश देतो असा महिमा या चतुर्थीचा आहे.

## आश्विन वद्य चतुर्थी

आश्विन कृष्ण चतुर्थीस "दशरथ ललिता चतुर्थी" असे म्हणतात. दशरथाने ललिता या नावाच्या आपल्या मातोश्रीसह







गणेशपूजन केले. नंतर गणेशांनी प्रसन्न होऊन चतुर्थीचे नामाभिधान ठेविले आणि म्हणाले 'दशरथा! तुझ्या मातोश्रीसह माझे जो पूजन करील त्याला पुत्रपौत्र धनधान्याची वृद्धि करीन.' ही चंद्रोदयव्यापिनी अशी पाहिजे. या चतुर्थीस चंद्र लवकर उदयास येईल.

## कार्तिक शुद्ध चतुर्थी

कार्तिक शुक्ल चतुर्थीस "स्कंद चतुर्थी" याप्रमाणे कथिले आहे. षडाननाने तप करून प्रातःस्नान करून रक्त पद्माने मध्यान्हकाली गणेशपूजन केले. तेव्हा गणेशाने प्रसन्न होऊन आपले वाहन मयूर त्याला देऊन बर्हिवाहन याप्रमाणे त्याचे नामाभिधान ठेविले व कार्तिक शुद्ध चतुर्थी तुझ्याच नावाने ख्यातियुक्त होईल असा वर दिला.

## कार्तिक वद्य चतुर्थी

कार्तिक शुद्ध चतुर्थीस करक असे म्हणतात. ही चंद्रोदय व्यापिनी असावी. दोन्हीही दिवशी जर चंद्रोदय व्यापिनी असेल तर ती चतुर्थी प्रदोषव्यापिनी करावी असे राम कौतुक निर्णय सिंधूत स्पष्ट वर्णन केलेले आहे.

चतुर्थी चंद्रोदयी दोन्हीही दिवसात जर नसेल तर प्रदोष व्यापिनी जी असेल ती करावी. दोन्हीही प्रदोषव्यापिनी असेल तर परंपरेने जो करतात ती करावी. आता दोन्हीही दिवशी चंद्रोदय व्यापिनी असेल तर दुसरे दिवसाची व्यापिनी गणनाथ परायण जनांनी करावी असे धर्मप्रवृत्तिकार म्हणतात. दोन्हीही दिवसास अभाव असेल तर दुसरे दिवसाचीच करावी. तृतीया संपूर्ण असून चतुर्थी र्‍हस्वत्वास जर पावेल तर तृतीया युक्तच चतुर्थी करावी. कारण मात्र विघ्नगणेश्वर आहे. नागविद्धा करू नये.

## मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी

मार्गशोर्ष शुद्ध चतुर्थीचे नांव "मुकुंदा" असे आहे. हिचा कथाभाग असा आहे की मुकुंदा या नांवाच्या वरेण्य राजाच्या पत्नीने आपणास गणपतीने स्वतःच पुत्र होण्याचा वर द्यावा म्हणून पर्ण भक्षण करून बारा वर्षें तप केले. पुढें मुद्गलाची गांठ पडताच मुद्गलाने कथन केले की तू मार्गशोर्ष शुद्ध चतुर्थीस मध्याह्न-कालीपूजन कर. पुढे तिने भक्तीने गणेशाचे व्रत केले. गणपति प्रसन्न होऊन मी तुझा मुलगा होईन व तू ही चतुर्थी केलीस याकरिता या चतुर्थीस तुझेच नामाभिधान मी देतो व ही मुकुंदा नावाची चतुर्थी जो करील त्याला मी संतति देऊन अंती मुक्त करीन असें वरदान दिले.

## मार्गशीर्ष वद्य चतुर्थी

मार्गशोर्ष वद्य चतुर्थीस "सुभगा चतुर्थी" असे म्हणतात. या चतुर्थीचा महिमा असा आहे की रावणाची मुलगी सुभगा नावाची. हिने गणेश पति मिळावा म्हणून पुलस्त्य ऋषीने सांगितल्यावरून यथासांग चतुर्थी केली. गणपतीने गायीचें व खरादिपशूंचे रावणाच्या घरी रक्षण करण्याच्या निमित्ताने सुभगेस वरिलें व रासक्रीडा करून रावणाचा गर्व हरण केला. नंतर गणपतीने सुभगेस अंकावर घेऊन सांगितले की, तू मार्गशीर्ष वद्य चतुर्थी केलीस म्हणून या चतुर्थीचे नाव सुभगा होईल.

## पौष शुद्ध चतुर्थी

पौष शुद्ध चतुर्थींचे नाव "कामदा" असे आहे. या चतुर्थीस सर्व देवांनी अनुष्ठाने आरंभिली होती. तेणेकरून गणेश प्रसन्न झाले व सृष्टीचे सर्व कर्म गणेशाने देवांना शिकवले व सर्व

कामना परिपूर्ण झाल्या व रतीला शंकरानी जाळलेला मदन नेत्र-कटाक्षातून काढून ती सौभाग्यवती केली. सबब या चतुर्थीस "कामदा" असे म्हणतात.

### पौष वद्य चतुर्थी

पौष वद्य चतुर्थीस "तिला" चतुर्थी असे म्हणतात. तिळाचे लाडू करून गणेशास अर्पण केले व गणपतीने तिलासूर दैत्यास मर्दन करण्याची शक्ति पार्वतीस दिली. याकरता हिला "तिला चतुर्थी" म्हणतात.

### माघ शुद्ध चतुर्थी

माघ शुद्ध चतुर्थीस "विनायकी चतुर्थी" म्हणतात. याचे कारण कश्यपाच्या घरी आदितीच्या पोटी अवतार घेऊन काशीस जाऊन देवांतक व नरांतक यांना मारून काशीराजावर कृपा केली. याच चतुर्थीच्या दिवशी महादेवाचे पोटी अवतार घेऊन महादेवास काशी दिवोदासापासून घेववून दिली व ढुंढीराज याप्रमाणे गणेशाची ख्याती झाली. याकरता "ढुंढीराज" चतुर्थीही म्हणतात.

माघ शुक्ल चतुर्थीस जर उपोषण न होईल तर नक्त व्रत परायणी जे नर ढुंढीराजा तुला सायंकाळी अथवा मध्यान्हकाली पूजितील त्यांना सर्व देवांची पूजा केल्याचे पुण्य मिळेल. उपोषण करून भक्तीने जे मानव माघ शुक्ल चतुर्थीस मध्यरवि प्राप्त झालेला असताना गणेशाला पूजतात ते सर्वत्र विजयी होतात.

### माघ वद्य चतुर्थी

माघ कृष्ण चतुर्थीस "शांभवी चतुर्थी" म्हणतात. शंकराने सतीविरहनाशार्थ गणेशाचे जे व्रत केले तेणेकरून ढुंढीराज प्रसन्न

होऊन मी तुला सती हिमाचलाची कन्या होऊन वरीन व लोक या चतुर्थीस " शांभवी चतुर्थी " म्हणतील असे वरदान दिले.

### फाल्गुन शुद्ध चतुर्थी

फाल्गुन शुद्ध चतुर्थीस " सिद्धीविनायक चतुर्थी " म्हणतात. फाल्गुन शुद्ध चतुर्थीस जो कोणी कमलांनी, धोतऱ्याच्या फुलांनी, मोदकांनी गणेशाची मध्याह्नकाली पूजा करील त्याची कार्यसिद्धी होईल म्हणूनच हिला " सिद्धीदा चतुर्थी " म्हणतात. असे शास्त्र-वचन आहे.

### फाल्गुन वद्य चतुर्थी

फाल्गुन वद्य चतुर्थीस " रतीकंदर्प चतुर्थी " असे म्हणतात ही चंद्रउदय व्यापिनी असावी असे गणेश भागवतात सांगितले आहे.

या चतुर्थीच्या दिवशी चंद्रोदयी रतीच्या योगे करून गणेशाचे पूजन झाले आहे. शंकराचे गंगागौरीशी भांडण होऊन ते तपश्चर्येस बसले नंतर पार्वतीने मदनास आणून पुढे करून आपण भिल्ली-णीचा वेष घेऊन शंकरास भुलविण्यास आली असता शंकराने मदनास जाळून टाकले. नंतर रतीने गणेशाचे व्रत करून पतीस सजीव केले. म्हणून या चतुर्थीस लोक " रतीकंदर्प चतुर्थी " असे म्हणतील असे श्रीगणेश म्हणाले.

### संकष्ट चतुर्थी पूजा

संकष्टी चतुर्थी हे गणपतीच्या व्रतांपैकी एक व्रत असून ते दर महिन्याच्या वद्य पक्षातील (दुसऱ्या पंधरवड्यातील) चतुर्थीला करावयाचे असते. या दिवशी सबंध दिवसभर उपोषण करून रात्री श्रीसंकष्टहर गणपतीची पूजा करून नैवेद्य वगैरे दाखवून व चंद्रदर्शन घेऊन मग उपोषण सोडावयाचे असते. कोणत्याही

संकटाचे परिहारासाठी हे व्रत करण्याचा प्रघात आहे. गणपति ही देवता विघ्ननाशक आहे. त्यामुळे या व्रताचे पुण्येकरून साधकाची सर्व संकटे दूर होतात. त्यातल्या त्यात अंगारिका संकष्टी तर फारच महत्त्वाची असते. मंगळवारी संकष्टीचा जो योग येतो त्याला अंगारिका संकष्टी म्हणतात. बरेचसे गणपतीउपासक व इतर लोकही हे अंगारिका संकष्टीचे व्रत करतात. चंद्रदर्शन करून चंद्राची पूजा करून पारणे करणे हे या व्रताचे मुख्य अंग आहे.

## व्रताचा पूजाविधि

नेहमीप्रमाणे संध्याकाळी स्नान वगैरे करून शुचिर्भूत होऊन सर्व पूजा तयारी करून घ्यावी. पूजास्थानी आपले देवामध्ये गणपतीची एखादी तांबेपितळाची अगर चांदीसोन्याची मूर्ति असल्यास तिचीच पूजा करावी. (गणेश यंत्र असल्यासही चालेल) नसल्यास एक सुपारी घेऊन ती एका पाटावर मूर्तीचे जागी स्थापन करावी व तिची पूजा करावी. पूजेचा सर्वप्रकार, विधि व मंत्र मागील पूजेप्रमाणेच म्हणावयाचें.

## अंगारिका माहात्म्य

ज्याप्रमाणे आकाशात स्वर्ग त्याचप्रमाणे पृथ्वीवर अवंती नगरी होती. नगरीतील सर्व लोक आनंदी होते. कोणाला कसलेच दुःख नव्हते. मुलें आज्ञाधारक होती. आईवडिलांच्या आज्ञांचे पालन करीत. गुरुगृही जाऊन वेदाध्ययन करीत. पिता आपल्या मुलांचे कौतुक करीत. तर स्त्रिया पतीचे व मुलांचे कौतुक करीत. अवंती जणू दुसरा स्वर्गच होता. या नगरीच्या जवळून क्षिप्रा नावाची नदी वहात होती. या नदीच्या एका तटावर ऋषिमुनींचे आश्रम होते. पहाटेच्या वेळी शिष्य गुरूंकडून वेदमंत्र शिकत व त्याच वेळी सारी अवंती जागी होई. अवंती म्हणजे रक्षण करणारी.

नावाप्रमाणेच अवंती नगरी प्रजाजनांचे रक्षण करी. सूर्य उगवताच ऋषिमुनींच्या यज्ञास सुरवात होई. मोर आनंदानी नाचत, स्त्रिया गाणी गाऊन आपला आनंद प्रकट करीत. या आनंदाचे खरे कारण होते सत्यद्यन ऋषींची पवित्र तपोवने.

अशाच एका तपोवनात भारद्वाज ऋषींचा आश्रम होता. अनेक शिष्य त्यांच्या आश्रमात शिकत. भारद्वाज तपस्वी व ज्ञानी होते. त्यांच्या वेदोच्चाराने हरिणे भ्रमर सर्व स्तब्ध होत. भारद्वाज ब्राह्मी मुहूर्तावर नदीवर स्नानास जात. कमरेपर्यंत पाण्यात उभे राहून मंत्र म्हणत.

असेच एकदा ते नदीवर स्नानास आले. चोहोकडे शांतता होती. चंद्राचा प्रकाश पाण्यात पडला होता. शीतल प्रकाश सर्वत्र पसरला होता. अशा वेळी एक अप्सरा पृथ्वीवर आली. जवळ कोणी नाही हे पाहून ती स्वच्छंदपणे बागडू लागली. तिचा गौरवर्ण चांदण्यात चमकू लागला. नदीवर आलेल्या भारद्वाजांची नजर या कामिनीवर पडली. जसजसे तिचे स्वच्छंद वर्तन वाढत होते तसतसे भारद्वाज अधिक अस्वस्थ होत होते. कामाने भारद्वाज विव्हळ झाले. आपण कोण ? कोठे आहोत ? व काय करतो याचा विचारही ते विसरले. त्या अप्सरेला हात लावणार इतक्यात तिला चाहूल लागली व ती अंतर्धान पावली. कामविकाराने विव्हळ झालेले भारद्वाज जमिनीवर पडले. त्याच अवस्थेत रेतस्खलन झाले. भारद्वाजांची मूर्च्छा गेल्यावर ते नदीकडे जाऊ लागले. त्यांनी पाण्यात प्रवेश केला व स्नान करता करता ते प्रणवाचा जप करू लागले.

असेच दिवसमास लोटत होते. एकवीस महिन्यांनंतर पृथ्वीने एका अर्भकास जन्म दिला. त्याचा वर्ण तप्त सुवर्णासारखा होता

तर डोळे अंगाराप्रमाणे प्रज्वलित होते. पृथ्वीने त्याचे मोठ्या प्रेमाने संगोपन केले. मुलगा आता सात वर्षांचा झाला. एके दिवशीं त्याने पृथ्वी मातेला विचारले कीं माझा देह मनुष्यासारखा आहे, मग मला रक्तकांती कशी प्राप्त झाली? माझे वडील कोण व ते काय करतात ?

आता मुलगा मोठा झाला आहे हे पाहून पृथ्वीमातेने त्यास सर्वकथा कथन केली. त्यामुळे मुलास पित्याच्या भेटीची आतुरता लागली. एक दिवस पुत्राने आईजवळ पित्याच्या दर्शनाची इच्छा प्रकट केली. पृथ्वीने मुलासह भारद्वाजांच्या आश्रमात प्रवेश केला. ते शिष्यांना शिकवीत होते. रक्तकांतीच्या मुलास पाहून त्यांना आश्चर्य वाटले. पृथ्वीने त्यांस सांगितलें की हा आपलाच पुत्र आहे. पुत्राने पित्यास वंदन केले व पित्यानेही त्याचा आनंदाने स्वीकार केला.

पुढे सुमुहूर्तावर भारद्वाजांनी त्याचे उपनयन केले. अनेक उपनिषदे वेद शिकविले व अखेर ॐ गं गणपतये नमः मंत्र देऊन त्याचे अनुष्ठान करण्यास सांगितले.

पित्याच्या आज्ञेनुसार तो नर्मदातीरी आला. तेथे एका गुहेत पद्मासन घालून पित्याने दिलेला मंत्र म्हणू लागला. प्रथम तो भिक्षा मागून जगे. पण पुढे वायु भक्षण करून त्याने तपाचरण सुरू केले. त्याने इंद्रिय दमन करून गजाननाच्या भेटीचा ध्यास घेतला. त्याने एक सहस्र वर्षे तपश्चर्या केली. तरी तो कुमार दिसत होता. त्याच्या उग्र तपश्चर्येने गणपति प्रसन्न झाला. त्याचे रूप भव्य व दिव्य होते. त्याचे सूर्याप्रमाणे तेजस्वी रूप पाहून त्या कुमाराने त्याला आदराने नमस्कार केला व गणेशाची स्तुति करण्यास प्रारंभ केला. त्याच्या स्तुतीने गणपति आनंदित

झाला, व बालकास म्हणाला मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे, तू कोणताही वर माग.

कुमार म्हणाला हे गणेशा तुझ्या दर्शनाने आज मी धन्य झालो आहे. तू जर माझ्यावर प्रसन्न झाला असशील तर मला स्वर्गात प्रवेश दे व त्याचप्रमाणे इतर देवांसह मला अमृत प्राशन करू दे. माझे मंगल असे नाव तिन्ही खंडात होऊ दे. व तू आज दर्शन दिलेली तिथि संकटनाशिनी होवो. असे म्हणून कुमाराने गणपतीला नमस्कार केला.

गणपतीने तथास्तु म्हणून त्यास आशीर्वाद दिला व पुढे म्हणाला की हे पृथ्वीच्या पुत्रा तुला लोक अंगारक म्हणतील व अंगारिका चतुर्थ्या करणारांना १२ चतुर्थ्यांचे पुण्य लाभेल.

अंगारकाला जसे गजाननाचे दर्शन झाले तशी त्याने मूर्ति स्थापिली व तिला मंगलमूर्ति नाव दिले. अंगारकाला मंगल व भौम अशीही नावे होती.

### अंगारिकेचे व्रत कसे करावे

माघ कृष्ण चतुर्थीस मंगळवार आला की त्याचे महत्त्व फारच मानले जाते. कृष्ण चतुर्थीचे दिवशी पहाटे मावळत्या चंद्राचे दर्शन घेऊन या व्रतास प्रारंभ करावा. सकाळी स्नानादि कर्मे उरकून शुचिर्भूत व्हावे व साधकाने एका आसनावर बसून मंगलमूर्तीच्या जपास सुरवात करावी काही खाऊ नये. त्या दिवशी मौन स्वीकारावे (शक्य असेल तर) सायंकाळी तीळ व आवळे वाटून त्याचा रस अंगाला लावावा आणि पुन्हा स्नान करावे. पुन्हा गणेशाचा मंत्र जपावा. साधारण ४८ मिनिटांनी गणपतीचे पूजन करावे. मोदक, अनारसे, कानवले, खीर यांचा नैवेद्य समर्पण करावा

चंद्रोदय होताच चतुर्थी तिथीस गजाननास व चंद्रास अर्घ्यप्रदान करावे. संकटग्रस्त मानवाची सर्व संकटे तो विघ्नहर्ता या व्रतानें त्वरित नष्ट करतो. ती दूर होण्यासाठी साधकाने गणपतीला व नंतर चंद्राला एकूण तेरा अर्घ्य द्यावेत. अर्घ्य तयार करताना त्यात तांबडे गंध, तांबड्या अक्षता, दूर्वा, लाल फुले आणि पाणी यांचा समावेश करावा. गणेशाला अर्घ्य देताना पुढील मंत्र म्हणावा.

गजानन नमस्तुभ्यं नानासिद्धिप्रदायिने ।
गृहाणार्घ्यं बुद्धिपते मया दत्तं शुभप्रदा ।
श्रीसिद्धिबुद्धिसहिताय सलक्षलाभाय इंद अर्घ्यं समर्पयामि ॥

नंतर चंद्राला सात अर्घ्य द्यावेत. प्रत्येक अर्घ्यानंतर चंद्राचे दर्शन घेऊन फुले अथवा दूर्वा त्यास अर्पण कराव्यात व नमस्कार करावा.

चंद्राचा अर्घ्य मंत्र–

अत्रिगोत्रसमुद्भूत गणेश प्रीतिवर्धन
गृहणार्घ्यं मया दत्तं रोहिण्यामृतधारक
श्रीरोहिणी सहिताय शशिनाथाय नमः
इदमर्घ्यं समर्पयामि ॥

अर्घ्य प्रदान करून गणेशाची सर्वोपचार पूजा करावी. शक्ती प्रमाणे २१, १२, १० किंवा १ ब्राह्मणास भोजन घालावे. विडा दक्षिणा देऊन त्यास संतुष्ट करावे. रात्री भजन कीर्तन करून संत समागम साधावा. हे व्रत पुण्यप्रद होते.

## श्रीगणपतीचे अलौकिक मंत्र

श्री गणपतीचे अनेक मंत्र आहेत. परंतु काही मुख्य मंत्रांचे निरूपण मंत्रोमहोदधी, मंत्रमहार्णव, रुद्रयामल, शारदातिलक

इत्यादि ग्रंथांतून केलेले आहे. यात मंत्राबरोबर त्या त्या मंत्राचे तंत्रही दिले आहे. हे मंत्र पारिभाषिक शब्दात आहेत. त्यामुळे ते समजत नाहीत. गणपति अथर्वशीर्षातील 'गणादि' पूर्णमुच्चार्य हाही मंत्र पारिभाषिक आहे. योगशास्त्रात बीजाक्षरांचे प्रमुख आठ प्रकार सांगितले आहेत. ते कामबीज, योगबिज, गुरुबीज, शक्तिबीज, रमाबीज, तेजोबीज, शान्तिबीज आणि रक्षबीज. मंत्र-महोदधीमध्ये द्वितीय तरंगात गणेश उपासनेचे मंत्र व त्याचे तांत्रिक प्रयोग सांगितले आहेत. पूर्व खंडातील पंचम तरंगात गणेश तंत्र हे स्वतंत्र प्रकरण आहे. त्यात उच्छिष्ट गणपति, हरिद्रा गणपति, ऋणहर्तुगणेश मंत्राभिधान, सिद्धिविनायक, लक्ष्मी विनायक, शक्तिविनायक वगैरे अनेक गणपतिमंत्राचे प्रकार आहेत. हरिद्रागणेश यंत्र, त्रैलोक्य मोहनकर गणेश यंत्र अभिष्टच सिद्धयर्थं बत्तीस अक्षरी मंत्र, लक्ष्मी विनायक यंत्र, शक्तिविनायक यंत्र, वक्रतुंड यंत्र, गणेश यंत्र, उच्छिष्ट गणपति नवार्ण यंत्र वगैरे अनेक यंत्रे, मंत्र महार्णव ग्रंथात सांगितली आहेत.

मेरुतंत्रात १९–२० या प्रकरणात अरसिमा विनायक मंत्र मोदक प्रिय गणेश यंत्र, पश्चिमाम्नायोक्त गणेश मंत्र वगैरे मंत्र आहेत.

## काही सिद्धिदायक मंत्र

१) एकाक्षरि गणेश मंत्र :– ॐ गँ ॐ

गणपतीचा हा मंत्र सर्व साध्य करून देणारा आहे. साधकाने स्नानादि कर्मे उरकून या मंत्राचा रोज १०८ वेळा जप करावा.

२) षडाक्षरी गणेश मंत्र –ॐ वक्रतुंडाय हुं ॐ

३) अष्टाक्षरी गणेश मंत्र – ॐ गजाननाय नमः ।

४) शक्ति विनायक मंत्र – ॐ ऱ्हों ग्रीं ऱ्हीं या मंत्राचा साधकाने कमीत कमी ५ लाख जप करावा. ऐश्वर्य प्राप्त होईल हे नक्की. श्रद्धा असणे आवश्यक.

५) लक्ष्मी विनायक मंत्र – ॐ श्रीं गं सौम्याय गणपतये वर वरद सर्वजनं वशमानय स्वाहा ।

या मंत्राने आर्थिक वाढ होईलच परंतु सर्वांस वश करून घेण्याचे सामर्थ्य या मंत्रात आहे.

६) श्रीत्रैलोक्य मोहनकर गणेशमंत्र – ॐ वक्रतुंडैकदंष्ट्राय क्लीं ऱ्हीं श्रीं गं गणपतये वर वरद सर्वजनं मे वशमानय स्वाहा ।

७) हरिद्रागणेश मंत्र – ॐ हुं गं ग्लौं हरिद्रागणपतये वर वरद सर्वजन हृदयं स्तंभय स्तंभय स्वाहा ।

या मंत्राचे रोज १०८ वेळा याप्रमाणे जप केल्याने आजारातून मुक्तता होईल. उष्णतेचे विकार नष्ट होतील.

८) श्रीऋणहरणकर्तृगणपतिमंत्र – ॐ गणेश ऋण छिंदि छिंदि वरेण्यम् हु नमः फट् ।

कर्जमुक्तीसाठी वरील मंत्राचा रोज १०८ वेळा जप करावा.

९) सिद्धिविनायक मंत्र – ॐ नमो सिद्धिविनायकाय सर्व कार्यकत्रे सर्व विघ्नप्रशमनाय सर्वराज्यवश्यनुकरणाय सर्वजन-सर्वस्त्रीपुरुषाकर्षणाय श्रीं ॐ स्वाहा ।

१०) एकतीस अक्षरी वक्रतुंड मंत्र – ॐ रायस्पोषस्य ददिता निधिदो रत्न धातुमान रक्षोहणोबलगहनो वक्रतुंडाय हु ॐ

११) वक्रतुंड कवच मंत्र – ॐ ऐं क्लीं ह्रीं वक्रतुंडाय हुं ॐ

१२) संकटहर गणेश मंत्र – ॐ नमो हेरंब मदमोदित मम संकष्ट निवारय निवारय हुंफट स्वाहा ।

नित्य नियमाने किमान १०८ वेळा या मंत्राचा जप केला तर संकटनाश होईल हे नक्की.

१३) संकटहर गणेश मंत्र – ॐ गीं गूं गणपतये नमः स्वाहा

वरीलप्रमाणेच जप.

१४) संकटहर गणेशमंत्र – ॐ गं गणपतये – सर्व विघ्न-हराय सर्वाय सर्वगुरवे लंबोदराय ह्रीं गं नमः ।

कोणत्याही संकटास तोंड देण्याचे सामर्थ्य या मंत्रात आहे रोज १०८ वेळा जपावा.

१५) महागणपति विद्यामंत्र – ॐ श्रीं ह्रीं क्लीं ग्लौं गं गणपतये वर वरद सर्वजनं मे वशमानय स्वाहाः ।

विद्यार्थ्यांनी रोज १०८ वेळा या मंत्राचा जप केल्यास बुद्धि कुशाग्र बनेल.

१६) हरिद्रा गणपति मंत्र – ॐ ग्लौं ॐ ।

या जपामुळे सरकारी त्रास, खटले, देवी, गोवर, भाजून झालेल्या जखमा बऱ्या होतात.

१७) शत्रुनाशक गणेश मंत्र — ॐ गं गणपतये मम, शत्रूं उफरय कुरु कुरु स्वाहा ।

प्रबळ शत्रूला सुद्धा तोंड देण्याचे सामर्थ्य या जपामुळे येईल.

१८) सार्वभौम गणेश मंत्र – ॐ ह्रीं ऐं श्रीं सर्व शक्ति कमलासनाय नमः ।

या मंत्राची उपासना केल्यास अधिकार प्राप्त होतो.

१९) उच्छिष्ट गणेश मंत्र – ॐ ह्रीं गं हस्तिपिशाची लिखे स्वाहा।

२०) अष्टाक्षरी गणेश मंत्र – ॐ गं गणपतये नमः ।

या बीज मंत्राने सर्वच गोष्टी साध्य होतात. रोज १०८ वेळा जपावा ।

२१) गणेश गायत्रीमंत्र – ॐ एकदन्ताय विद्महे वक्रतुंडाय धीमहि तन्नोदन्ती प्रचोदयात् ।



# श्रीगणेशयंत्र

सर्व देवतांमध्ये अग्रपूजेचा ज्याला मान मिळालेला आहे त्या गणेशाचे माहात्म्य अनन्य साधारणच आहे. विघ्नहर्ता व सुख-कर्ता असाच तो गणपति. गणपतीची पूजा करताना त्याच्या यंत्राची पूजा केली तर ती सर्व कामनापूर्ति करणारी ठरते. ।। विद्यार्थी लभते विद्यां धनार्थी लभते धनं असे त्याचे वर्णन केलेच आहे. खाली दिलेल्या गणेश यंत्राची साधकांनी तांब्याची प्रतिमा करून घ्यावी व ती पूजेत ठेवावी.

यंत्राची प्रतिष्ठापना विनायकी किंवा संकष्ट चतुर्थीला करावी. कोणत्याही गोष्टीला सकाळची वेळ जास्त शुभ असल्यामुळे सकाळी स्नान वगैरे उरकून या यंत्राची स्थापना करावी. या पूजाविधीस ब्राह्मण बोलाविल्यास उत्तमच, नाहीतर गणेशाच्या यंत्राची पूजा करून त्यास रक्त चंदन, लाल फूल, मोदक किंवा गूळ खोबऱ्याचा नैवेद्य दाखवावा. उदबत्ती निरांजन गणेशाला ओवाळावी.

"ॐ गं गणपतये नमः । या मंत्राचा अठरा हजार वेळा जप करावा. निदान हा जप १०८ वेळा नियमित न चुकता करावा. वरील मंत्राचा जप रोज १८००० याप्रमाणे २२५ दिवस केला तर तो सिद्ध होतो व मानवास सर्व गोष्टी साध्य होतात. जस जशी या यंत्राची उपासना वाढत जाईल तसतसे त्याचें फल मान-वाला दिसू लागेल. गणेशयंत्राची पूजा करताना गणपति स्वप्नात येईल व पुढील गोष्टीसंबंधी सूचनाही मिळतील. अंग थरथरू लागेल. असे होऊ लागले तर ती शुभ गोष्ट जाणावी. रागासारखे विचार जरी मनात आले तरी मन शान्त रहाते. आलेले संकट निर्विघ्नपणे पार पडते. अंगात उत्साह कायम राहतो.

गणेशयंत्रपूजेमुळे विद्यार्थ्यांना फायदा होतोच. परंतु अडखळून पडलेले विवाह, घराची कामे, आर्थिक स्थैर्य, धनलाभ, नोकरी प्रमोशन इ. साऱ्या गोष्टी शुभच घडतात.

गणेश यंत्राची पूजा झाल्यावर ' ॐ गं गणपतये नमः ' चा जप किमान १०८ वेळा करावा हे वर सांगितलेच आहे. त्याच्या जोडीला पुढील स्तोत्र म्हणावे. ( जमल्यास रोज अथर्वशीर्ष पठण करावे. नाहीतर

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ।।१।।
विघ्नान्नाशय मे सर्वन्नाशायोपस्थितान प्रभो त्वम् ।।

## एकाक्षर गणपतियंत्रम्




ॐ गं ॐ

## वक्रतुंड गणेशयंत्रम्




## शक्ति विनायकयंत्रम्



**वि. सू.** हे यंत्र जाड तांब्यावर कोरलेले व अनुष्ठानाने सिद्ध केलेले श्रीगजानन बुक डेपो. कबुतरखाना दादर, मुंबई २८ व भरत नाट्य मंदिरा समोर पुणे ३० या दोन्ही ठिकाणी विक्रीस आहे. हे यंत्र पूजेत ठेवावे व रोज त्याचे दर्शन घ्यावे एवढेच याला बंधन आहे.

## लक्ष्मी विनायकयंत्रम्




## त्रैलोक्यमोहनकर गणेशयंत्रम्





# श्रीगणपतीची अष्टोत्तरशात (१०८) नामावलि.

(१) विघ्नेशाय नमः (२) विश्व वरदाय नमः (३) विश्वचक्षुषे नमः
(४) जनप्रभवे नमः (५) हिरण्यरूपाय नमः (६) सर्वात्मने नमः
(७) ज्ञानरूपाय नमः (८) जगन्मयाय नमः (९) ऊर्ध्वरेतसे नमः
(१०) महाबाहवे नमः (११) अमेयाय नमः (१२) अमितविक्रमाय नमः
(१३) वेदवेद्याय नमः (१४) महाकालाय नमः (१५) विद्यनिधये नमः
(१६) अनामयाय नमः (१७) सर्वज्ञाय नमः (१८) सर्वशाय नमः
(१९) शांताय नमः (२०) गजास्याय नमः (२१) चित्तेश्वराय नमः
(२२) विगतज्वराय नमः (२३) विश्वमूर्तये नमः (२४) अमेयात्मने नमः
(२५) विश्वधाराय नमः (२६) सनातनाय नमः (२७) समगाय नम
(२८) प्रियाय नमः (२९) मंत्रिणे नमः (३०) सत्त्वधाराय नमः

(३१) सुराधीशाय नमः (३२) समस्तसाक्षिणे नमः (३३) निर्द्वंद्वाय नमः (३४) निर्लोकाय नमः (३५) अमोघविक्रमाय नमः (३६) लाय नमःनिर्म (३७) पुष्याय नमः (३८) कामदाय नमः (३९) कांतिदाय नमः (४०) कामरूपिणे नमः (४१) कामपोषिणे नमः (४२) कमलाक्षाय नमः (४३) गजाननाय नमः (४४) सुमुखाय नमः (४५) शर्मदाय नमः (४६) मूषकाधिपवाहनाय नमः (४७) शुद्धाय नमः (४८) दीर्घतुंडाय नमः (४९) श्रीपतये नमः (५०) अनंताय नमः (५१) मोहवर्जिताय नमः (५२) वक्रतुंडाय नमः (५३) शूर्पकर्णाय नमः (५४) परमाय नमः (५५) योगीशाय नमः (५६) योगधाम्ने नम. (५७) उमासुताय नमः (५८) आपद्धर्त्रे नमः (५९) एकदंताय नमः (६०) महाग्रीवीय नम. (६१) शरण्याय नमः (६२) सिद्धसेन्याय नमः (६३) सिद्धवेदाय नमः (६४) करुणाय नमः (६५) सिद्धाय नमः (६६) भगवते नमः (६७) अव्यग्राय नमः (६८) विकटाय नमः (६९) कपिलाय नमः (७०) कुंदुदिराजाय नमः (७१) उग्राय नमः (७२) भीमोदराय नम· (७३) शुभाय नमः (७४) गणाध्यक्षाय नमः (७५) गणेशाय नमः (७६) गणराध्याय नमः (७७) गणनायकाय नमः (७८) ज्योति स्वरूपाय नम. (७९) भूतात्मने नमः (८०) धूमकेतवे नमः (८१) अनुकूलाय नम· (८२) कुमारगुरवे नमः (८३) आनदाय नमः (८४) हेरंबाय नमः (८५) वेदस्तुताय नमः (८६) नागयज्ञोपवीतिने नमः (८७) दुर्धर्षाय नमः (८८) बाल दूर्वांकुरप्रियाय नमः (८९) भालचंद्राय नमः(९०)विश्वधात्रे नमः (९१) शिवपुत्राय नमः(९२) विनायकाय नमः (९३) लीलासेवितायय नमः (९४) पूर्णाय नमः (९५) परमसुंदराय नमः (९६) विघ्नाधकाराय नमः (९७) सिंदूरवरदाय नमः (९८) नित्याय नमः (९९) विभवे नमः (१००) प्रथमपूजिताय नमः (३०१) दिव्यपादाब्जाय नमः (१०२) भक्त-मंदराय नमः (१०३) शूरमहाय नमः (१०४) रत्नसिंहासनाय नमः (१०५) मणिकुंडलमंडिताय नम. (१०६) भक्तकल्याणाय नमः (१०७) अमेयाय नमः (१०८) कल्याणगुरवे नमः (१०९) सहस्त्रशीर्षे नमः (११०) महागणपतये नमः